# महाराष्ट्र शासन

जलदगती डाकेद्वारे
(By Speed Post)

**क्रमांक:** मोसाअ-२००९(९)/(प्र.क्र. १/१०)पाच,
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :** १९ जानेवारी, २००९

प्रति,

अपर प्रबंधक,
उच्च न्यायालय (अ.शा./मू.शा.),
मुंबई.

**विषय :- सन २००९-२०१० या वित्तीय वर्षात मोटार वाहने खरेदी करण्यासाठी अग्रिम धन प्रमाणित करणेबाबत.**

**महोदय,**

विषयांकित प्रकरणी आदेशावरुन मा.मुख्य न्यायमूर्तींच्या माहितीकरिता आपणांस कळविण्यात येते की, सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या **२९** अर्जदारांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे **एकूण रुपये १२,६०,१३७/- (एकूण रुपये बारा लाख साठ हजार एकशे सदतीस फक्त)** इतकी रक्कम मोटार वाहने खरेदी करण्यासाठी अग्रिम म्हणून मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १३६, १३७ व १३९ च्या अधिन राहून २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरिता अर्जदाराच्या संबंधित कार्यालय प्रमुख/मंजुरी अधिकारी यांनी केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येत आहे.

२. अर्जदारांनी मोटार वाहने खरेदी केल्यास त्यांच्या कार्यक्षमतेत वाढ होईल याची खात्री झाल्यांनतरच अग्रिम मंजूर करण्यात यावे.

३. याव्दारे प्रमाणित केलेले अग्रिम शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रिम-१०९९/प्र.क्र.३/९९/विनियम, दिनांक ९/७/१९९९ व क्रमांक अग्रिम-१००५/प्र.क्र.१८/२००५/विनियम, दि.२० जून, २००५ मधील तरतूदींच्या व अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात यावे.

a) वाहनाच्या मॉडेलचे नाव, उत्पादनाचे वर्ष, खरेदीची तारीख व खरेदी पावती/बील व नोंदणीचे कागदपत्र सादर करण्यात यावेत.

b) नवीन मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेडचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची दक्षता घ्यावी.

c) नवीन मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेड शासनाकडे तारण ठेवली पाहिजे.

d) एकदा अग्रिम दिल्यानंतर त्यानंतरच्या पाच वर्षामधील काळात मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेड व अपंग राज्य शासकीय कर्मचा-यांसाठी स्वयंचलित तीन चाकी सायकल या प्रयोजनासाठी अग्रिम अनुज्ञेय राहणार नाही.

e) संबंधित अर्जदारास अग्रिम प्रदान करण्यात आल्यानंतर वाहन खरेदीबाबतचे तसेच वाहन गहाण ठेवण्याबाबतचे कागदपत्र एक महिन्याच्या कालावधीमध्ये शासनास सादर करणे आवश्यक आहे. संबंधित अर्जदारास अग्रीम मंजूरीच्या वेळी याबाबत आवश्यक सुचना

देण्यात याव्यात. अन्यथा सदर प्रकरणी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रीम-१०९५/प्र.क्र.७०/९५/विनियम, दिनाक २६ सप्टेंबर, १९९५ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

४. अर्जदाराच्या सेवानिवृत्तीचा दिनांक लक्षात घेऊन जर अर्जदार सदर अग्रिमास पात्र ठरत असेल, तर **अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार अनुदान उपलब्ध असेल तोपर्यंत** उपरोक्त अग्रिम धन मंजुरीचे आदेश काढण्यात यावेत. अन्यथा हे प्राधिकारपत्र मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १३३ च्या तरतूदीनुसार अग्राहय होईल.

५. अर्जदाराची एकूण अग्रिम वजाती त्याच्या वेतनाच्या ५० टक्केपेक्षा जास्त असता कामा नये.

६. अर्जदार खरेदी करणार असलेल्या मोटार वाहनाची किंमत प्रमाणित अग्रिमापेक्षा कमी असल्यास शिल्लक रक्कम शासनास ताबडतोब परत केली जाईल याची काळजी घ्यावी व त्याबाबत शासनास अवगत करण्यात यावे.

७. हा खर्च "मागणी क्र.जे-५-७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे-(योजनेतर/दत्तमत) २०२ (००) (०१) मोटार वाहने खरेदी अग्रीमे (लेखाशीर्ष संकेतांक ७६१० ०४८ १) या शीर्षाखाली २००९-२०१० या सालाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८. मोटार वाहने खरेदी अग्रिमाची वसुली ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे २०२-मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (७६१० ५०२ ४००) या जमाशीर्षाखाली जमा करावी व त्यावरील व्याज ००४९ व्याजाच्या जमा रकमा ८०० इतर जमा रकमा (००४९ ००६ १००) (४६) (२) मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा या जमाशीर्षाखाली जमा करावी.

९. हे अग्रिम धन मंजूर केलेल्या आपल्या कार्यालयाच्या आदेशाची प्रत शासनास त्वरीत पाठविण्यात यावी. तसेच प्रत्यक्ष कोषागारातून अग्रिम काढल्याचा दिनांक आणि त्यासंबंधीचा प्रमाणक क्रमांक ही शासनास कळविण्यात यावा. तसेच प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित केलेली रक्कम त्वरीत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

१०. **नवीन मोटार सायकल** अग्रिम वसूली **६० समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह,** तर **स्कूटर अग्रिम** वसूली **४८ समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह** वसूल करण्यात यावी. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रिम १०९९/प्र.क्र.१६/९९/विनियम, दिनांक १०/३/२००० मधील परिच्छेद २(आ) (२) अनुसार नवीन **मोटार कार खरेदी** करण्यासाठी मंजूर करण्यात येणा-या अग्रिमाची वसूली करताना प्रथमतः **मुद्दलाची १०० समान मासिक हप्त्यात** वसूली करावी व त्यानंतर **व्याजाची वसूली ६० हप्त्यात** करावी.

**मात्र,** एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्याचे १६० महिने पूर्ण होण्यापूर्वीच सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

तसेच परिच्छेद २(इ)(२) अनुसार **जुनी मोटार कार खरेदी** करण्यासाठी मंजूर करण्यात येणा-या अग्रिमाची वसूली करताना प्रथमतः **मुद्दलाची वसूली ५० समान मासिक हप्त्यात** करावी व त्यानंतर **व्याजाची वसूली ३० हप्त्यात** करावी. मात्र एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्याचे ८० महिने पूर्ण होण्यापूर्वीच सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

११. आपणास कळविण्यात येते की, सदर अग्रिम अर्जदाराने त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र व खरेदीखताची प्रत आणि गहाणखताची प्रत या विभागास ताबडतोब पाठविण्यात यावी.

११. आपणास कळविण्यात येते की, सदर अग्रिम अर्जदाराने त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागास ताबडतोब पाठविण्यात यावे. तसेच खरेदीखत आणि गहाणखताच्या प्रती संबंधित कर्मचारी/अधिकारी यांचेकडून प्राप्त करुन घेऊन कार्यालयाच्या अभिलेखामध्ये जतन करण्यात याव्यात.

१२ संबंधित अधिकारी आपल्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेलेला असल्यास, **अर्थसंकल्पिय वित्तीय प्रणालीवर Athorisation Slip काढण्यापूर्वी,** त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, **प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच** देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी.

१३. जर काही कारणास्तव सदर अग्रिम मंजूर करण्यात येत नसेल अथवा नाकारण्यात येत असेल तर तसे या विभागास कळविण्यात यावे.

१४. आपल्या कार्यालयातील अर्जदारास त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या रकमे इतकेच अग्रिम धन मंजूर करावे. निर्देशिलेल्या अर्जदाराव्यतिरिक्त दुस-या कोणत्याही अर्जदारास हे अग्रिम देय होणार नाही याची कृपया नोंद घ्यावी.

१५. संबंधित कार्यालयाने शिफारस केल्यानुसार शासकीय कर्मचा-यास अग्रिम प्रमाणित करण्यात आलेले आहे. तथापि, अर्जदाराचे **पाचव्या वेतनआयोगानुसार लागू असलेले मूळ वेतन** हे शासन निर्णय दि.२० जून, २००५ अनुसार विहित मर्यादेत आहे किंवा कसे याची खात्री केल्यानंतरच त्यास अग्रिम मंजूर करण्यात यावे.

१६. हे पत्र निधी उपलब्धतेचे प्रमाणपत्र आहे.

आपला,

(बा.कि.रासकर)
शासनाचे अवर सचिव

**प्रत-माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी :**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ( २ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर ( २ प्रती)
प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ नागपूर, नागपूर,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, जळगाव, धुळे, नागपूर, परभणी, चंद्रपूर, लातूर, जालना, नांदेड, उस्मानाबाद, बुलढाणा,
जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव, धुळे, नागपूर, परभणी, चंद्रपूर, लातूर, जालना, नांदेड, उस्मानाबाद, बुलढाणा,
विधी व न्याय विभाग (कार्यासन २३ व २४),
वित्त विभाग (अर्थसंकल्प १०)
निवड नस्ती.

| शासन पत्र क्रमांक मोसाअ-१००९/(९)/(प्र.क्र. १/१०)/पाच, दिनांक १९ जानेवारी, २०१० चे सहपत्र | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
| १ | श्री.एस.एन. पाखले, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. जळगाव | नवीन मोटार सायकल | ४१४०० | मूळ वेतनानुसार |
| २ | श्री.आर.पी. बेंडाळे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. जळगाव | नवीन मोटार सायकल | ४२३०० | मूळ वेतनानुसार |
| ३ | श्री.ए.एस. संके, लघुलेखक | जि.व स.न्या. धुळे | नवीन मोटार सायकल | ३७७१९ | कोटेशननुसार |
| ४ | श्री.सी.बी. अहिरराव, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. धुळे | नवीन मोटार सायकल | ४३२०० | मूळ वेतनानुसार |
| ५ | श्री.एस.डी. दारव्हेकर, लिपिक | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, नागपूर | नवीन मोटार सायकल | ४४४२० | मागणीनुसार |
| ६ | श्री.असिफ अन्वर, लिपिक | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, नागपूर | नवीन स्कूटी पेप प्लस | २८००० | नियमानुसार |
| ७ | श्री.आर.जी. बोंद्रे, सेक्शन रायटर | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, नागपूर | नवीन मोटार सायकल | ४४४२० | मागणीनुसार |
| ८ | श्री.व्ही.जे. काळे, वाहन चालक | जि.व स.न्या. नागपूर | नवीन मोटार सायकल | ३७२१८ | मूळ वेतनानुसार |
| ९ | श्री.आय.जी. सोनकुसरे, लघुलेखक | जि.व स.न्या. नागपूर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| १० | श्री.सी.ए. पानसे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. परभणी | नवीन मोटार सायकल | ४१४०० | मूळ वेतनानुसार |
| ११ | श्री.पी.एन. पाटील, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. चंद्रपूर | नवीन स्कूटी स्ट्रीक | २८००० | नियमानुसार |
| १२ | श्री.व्ही.जी. टिंगरे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. लातूर | नवीन मोटार सायकल | ४३२०० | मूळ वेतनानुसार |

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १३ | श्री.सी.डी. काळे, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. जालना | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| १४ | श्री.जे.के. क्षिरसागर, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. जालना | नवीन मोटार सायकल | ४२१२० | कोटेशननुसार |
| १५ | श्री.एस.एच. ग्वालाणी, दिवाणी न्यायाधीश | जि.व स.न्या. जालना | नवीन मोटार कार | १२९००० | नियमानुसार |
| १६ | श्री.डी.आय. चव्हाण, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ३९७०० | मागणीनुसार |
| १७ | श्री.जी.ई. मोरे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ४२३०० | मूळ वेतनानुसार |
| १८ | श्री.डी.टी. मोरे, वाहन चालक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ३८७०० | मूळ वेतनानुसार |
| १९ | श्री.आर.एस. नेहूलकर, मुख्य बेलिफ | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २० | श्री.व्ही.के. कदम, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| २१ | श्री.एम.बी. चौधरी, वाहन चालक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ३८७०० | मूळ वेतनानुसार |
| २२ | श्री.पी.एन. नक्षणे, वाहन चालक | जि.व स.न्या. चंद्रपूर | नवीन मोटार सायकल | ३१८६० | मूळ वेतनानुसार |
| २३ | श्री.मोहम्मद शकील अब्दुल जब्बार, वाहन चालक | जि.व स.न्या. चंद्रपूर | नवीन मोटार सायकल | ३७९८० | मूळ वेतनानुसार |
| २४ | श्री.एस.व्ही. जोशी, लघुलेखक | जि.व स.न्या. उस्मानाबाद | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २५ | श्री.डी.एन. अंबुरे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. उस्मानाबाद | नवीन मोटार सायकल | ४४१०० | मूळ वेतनानुसार |

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| २६ | श्री.ए.एम. व्हटकर, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. उस्मानाबाद | नवीन मोटार सायकल | ४१४०० | मूळ वेतनानुसार |
| २७ | श्रीमती वाय.डी. घाटोळ, लघुलेखक | जि.व स.न्या. जळगाव | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २८ | श्री.ए.पी. देवारकर, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. चंद्रपूर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २९ | श्री.यू.ए. डाफणे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| | | | **एकूण रुपये** | **१२६०१३७** | |
| **(एकूण रुपये बारा लाख साठ हजार एकशे सदतीस फक्त)** | | | | | |

(बा.कि.रासकर)
शासनाचे अवर सचिव

**ता.क.** : संबंधित कार्यालयाने शिफारस केल्यानुसार शासकीय कर्मचा-यास अग्रिम प्रमाणित करण्यात आलेले आहे. तथापि, अर्जदाराचे **पाचव्या वेतनआयोगानुसार लागू असलेले मूळ वेतन** हे शासन निर्णय दि.२० जून, २००५ अनुसार विहित मर्यादेत आहे किंवा कसे याची खात्री केल्यानंतरच त्यास अग्रिम मंजूर करण्यात यावे.

# महाराष्ट्र शासन

जलदगती डाकेद्वारे
(By Speed Post)

क्रमांक : घबाअ-२००९-(९)/(प्र.क्र.२/१०)/पाच,
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ जानेवारी, २००९.

प्रति

अपर प्रबंधक,
उच्च न्यायालय (अ.शा./मू.शा.),
मुंबई.

**विषय :- घरबांधणी अग्रिम धन प्रमाणित करणेबाबत**
**सन २००९-२०१०.**

**महोदय,**

उपरोक्त विषयांसंदर्भात आदेशावरुन, मा.मुख्य न्यायमूर्तींच्या माहितीकरिता, आपणांस असे कळविण्यात येते की, सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या **१०** अर्जदारांची माहिती, अग्रीम प्रमाणित करण्यासाठी छाननीनंतर योग्य आढळून आलेली आहे. त्यांना सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मुंबई वित्तीय नियम, १९५९ व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणा व फेरबदल व त्या अनुषंगाने शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय/परिपत्रके इत्यांदिंच्या अधिन राहून २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरिता घरबांधणी अग्रीम **एकूण रुपये २४,०८,९६०/- (एकूण रुपये चोवीस लाख आठ हजार नऊशे साठ फक्त)** प्रमुख/मंजुरी अधिकारी यांनी केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येत आहे.

| अ. क्र. | यादी क्रमांक | अर्जदारांची संख्या | प्रमाणित रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | यादी क्रमांक १ :- सर्व साधारण- (वर्ग-३ व त्यावरील अधिकारी व कर्मचारी) | ५ | ११९१५९० |
| २ | यादी क्रमांक २ :- मागास वर्ग (वर्ग ३ व त्यावरील अधिकारी व कर्मचारी) | ४ | ११२५००० |
| ४ | यादी क्रमांक ३ :- सर्व साधारण- - (वर्ग ४ चे कर्मचारी) | १ | ९२३७० |
| | **एकूण** | **१०** | **२४०८९६०** |

**(एकूण रुपये चोवीस लाख आठ हजार नऊशे साठ फक्त)**

२. मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मध्ये विहित केलेल्या अटींच्या अधिन राहून प्रमाणित अग्रीमास मंजुरी देण्यापूर्वी अर्जदारांकडून तो निवृत्त होण्यापूर्वी संपूर्ण अग्रीमाची व्याजासह वसुली होईल व प्रकरणपरत्वे अर्जदाराने सर्व बाबींची / कागदपत्रांची पूर्तता केलेली आहे व ते स्थायी असल्याची पूर्ण खात्री करुन घेतल्यावरच या अग्रीमास मंजुरी देण्यात यावी. **अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर अनुदान उपलब्ध असेपर्यंत** या अग्रीम धनास मंजुरी देऊन अग्रीमाची रक्कम कोषागारातून काढण्यात यावी. तसेच कोषागारातून रक्कम;काढल्यानंतर ती रक्कम तीन दिवसाच्या आत संबंधित अर्जदाराला देण्यात यावी.

३. हा खर्च (मागणी क्रमांक जे-५) ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादिना कर्ज (योजनेतर/दत्तमत) २०१(००)(०१)-घरबांधणीसाठी अग्रीम ( लेखाशीर्ष संकेतांक ७६१० ०४७ २) खाली खर्ची टाकण्यात यावा व २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या लेखानुदानातून भागविण्यात यावा.

४. **जमीन खरेदी करुन घर बांधणे** या प्रयोजनासाठी अग्रीमाचा पहिला हप्ता मंजूर केल्यानंतर दुसरा हप्ता मंजूर करण्याची शिफारस करण्यापूर्वी अर्जदाराच्या घराचे मंजूर आराखडे स्थानिक प्राधिकरणाच्या मंजुरी आदेशाची प्रत व मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र बी-१ मध्ये अर्जदाराने भरुन दिलेल्या गहाण खताची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

५. **घरबांधणी** प्रयोजनार्थ अग्रीम घेतले आहे अशा प्रकरणी अर्जदाराने बांधकाम विहित टप्प्यापर्यन्त पूर्ण केले आहे याची खातरजमा करावी व तसा अहवाल व त्या टप्प्यापर्यन्त करण्यात आलेल्या खर्चाच्या पावत्या शासनाकडे सादर कराव्यात. ज्या अर्जदाराना ३ रा व ४ था हप्ता / अंतिम हप्ता म्हणून प्रमाणित करण्यात आला आहे त्या अर्जदारांकडून नियमानुसार आवश्यक त्या संपूर्ण कागदपत्रांची पूर्तता करुन घेऊन नंतरच प्रत्यक्ष रक्कम प्रदान करावी.

६. **घरबांधणी** या प्रयोजनासाठी या पत्रानुसार प्रमाणित करण्यात आलेल्या अग्रीम धनास प्रत्यक्ष मंजुरी देण्यापूर्वी अर्जदाराने मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र बी-२ मध्ये अर्जदाराने भरुन दिलेल्या गहाण खताची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

७. **तयार घर खरेदी** या प्रयोजनासाठी अग्रीम प्रमाणित करण्यात आलेल्या अर्जदारांकडून मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र ए-२ मध्ये करारनाम्याची प्रत अर्जदाराने भरुन घेण्यात आल्यावरच अग्रीमाची रक्कम प्रत्यक्षात अदा करण्यात यावी.

८. **घरखरेदीसाठी/घरबांधणीसाठी वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड** या प्रयोजनासाठी अग्रीम प्रमाणित करण्यात आले आहे अशा अर्जदारांकडून अग्रीम मंजुरी पूर्वी त्यांच्या कर्ज शिलकीबाबतचे संबंधित वित्तीय संस्थेने दिलेले अलिकडील प्रमाणपत्र घेऊन प्रत्यक्ष उर्वरित कर्जाइतकेच अग्रीम मंजूर करावेत व धनादेश संबंधित वित्तीय संस्थेच्या नावानेच देण्यात यावा.

९. ज्या अर्जदारांना हप्त्याने अग्रीम प्रमाणित करण्यात आले आहे अशा अर्जदारांकडून त्यांना मिळालेल्या अग्रीमाची वसुली, त्यावरील व्याजाची वसुली मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील तरतूदीनुसार प्रकरणपरत्वे करण्यात यावी.

१०. आपणांस असेही कळविण्यात येते की, सदर घरबांधणी अग्रीम मंजुरी आदेश काढतांना सदर सदनिकेचा वा घराचा विमा शासकीय विमा निधीकडेच उतरवावा अशी अट मंजुरी आदेशात घालावी व त्याचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर मंजुरी आदेशाची प्रत विमा संचालक महाराष्ट्र राज्य गृहनिर्माण भवन, म्हाडा, २६४, पहिला मजला, वांद्रे (पूर्व ) मुंबई-४०० ०५१ यांनाही माहितीसाठी अग्रेषित करावी.

११. हे अग्रीमधन मंजूर केलेल्या आपल्या कार्यालयाच्या आदेशाची प्रत शासनास पाठविण्यात यावी. तसेच प्रत्यक्ष कोषगारातून रक्कम काढण्याचा दिनांक व प्रमाणक क्रमांकही त्वरीत कळविण्यांत यावा.

तसेच प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित रक्कम **त्वरित** शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी. सदर रकमेचा विनियोग झाला किंवा कसे याबाबत या शासन पत्राच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत शासनास कळविण्यात यावे.

१२. आपणांस असेही कळविण्यात येते की, तयार घर खरेदी (जुने अथवा नवे) या प्रयोजनासाठी अर्जदारास शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ३ घबाअ १०८७/(४६५)/विनियम, दिनांक ६.११.१९९० मधील विशिष्ट अटींच्या अधीन राहून व त्यामध्ये नमूद केलेली सक्षम अधिका-याने दिलेली कागदपत्रे सादर केलेली आहेत याची खात्री झाल्यावरच अग्रीम मंजूर करण्यात यावा.

१३. अर्जदारास ज्या प्रयोजनासाठी अग्रीम मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी त्या रकमेचा अर्जदाराकडून विनियोग करण्यात आला याबद्दलचे विनियोग प्रमाणपत्र मंजुरी अधिका-याने शासनास पाठवावे.

१४. यादी क्रमांक २ मधील अर्जदार मागासवर्गीय असल्याची सेवापुस्तक किंवा जातीच्या दाखल्याच्या आधारे खात्री करुन घेतल्यानंतरच घरबांधणी मंजुरीचे आदेश काढावेत. सदर बाब १५ दिवसात पूर्ण न झाल्यास प्रमाणित रक्कम शासनास परत करण्यात यावी. जेणेकरुन सदर रक्कम इतर पात्र अर्जदारास प्रमाणित करणे शक्य होईल. जर काही कारणास्तव अग्रीम मंजूर करण्यात येत नसेल तर तसे शासनास त्वरीत कळविण्यांत यावे. तसे न झाल्यास यावरुन उद्भवणा-या अनियमिततेस सदर मंजुरी अधिकारी जबाबदार राहील याची कृपया नोंद घ्यावी.

१५. संबंधित अधिकारी आपल्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेलेला असल्यास, **अर्थसंकल्पिय वित्तीय प्रणालीवर Athorisation Slip काढण्यापूर्वी,** त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, **प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच** देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी.

१६. जर काही कारणास्तव अग्रीम मंजूर करण्यात येत नसेल तर तसे शासनास त्वरीत कळविण्यात यावे. तसेच प्रमाणित अग्रीमापेक्षा कमी रक्कम मंजूर करण्यात येत असेल तर तसेही समुचित तपशीलासह कळविण्यात यावे व प्रमाणित अग्रीमाची उर्वरित रक्कम या विभागास तात्काळ परत करण्यात यावी.

१७. घरबांधणी अग्रीमाच्या मुद्दलाची परतफेड 'घरबांधणी अग्रीम -७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादिना कर्जे-२०१-घरबांधणीसाठी आगाऊ रकमा (७६१०-५०१-५०० )' या जमा शीर्षाखाली आणि व्याज '००४९-व्याज जमा-८००-इतर जमा ( संकेतांक ००४९ ००६ १०० ) शासकीय कर्मचा-यांना दिलेल्या कर्जावरील व्याज ४५ (१) घरबांधणी अग्रीम' या जमाशीर्षाखाली जमा करण्यात यावे.

१८. या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेल्या अग्रीमावर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक घबाअ-१००७/प्र.क्र.४१/२००७/विनियम, दिनांक २९.०९.०७ मध्ये नमूद केल्यानुसार व्याजाची आकारणी करावी.

१९. सोबतच्या यादीतील अर्जदारानी प्रमाणित केलेले घरबांधणी अग्रीम हे संबंधित अर्जदाराच्या कार्यालय प्रमुख/मंजुरी अधिकारी यांनी केलेल्या शिफारशीवरुन प्रमाणित करण्यात येत आहे. तेव्हा नियमांच्या अधीन राहून अग्रीमाचे वितरण करणे व ती वसुल करणे त्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यालय प्रमुख / मंजुरी अधिकारी यांची राहील.

२०. सदरहू पत्र हे निधी उपलब्धता प्रमाणपत्र समजण्यात यावे.

आपला,

५।३

(बा.कि.रासकर)
शासनाचे अवर सचिव

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित-**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ( २ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर ( २ प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सह सचिव, विधी व न्याय विभाग, औरंगाबाद,
सचिव, विधी सेवा उपसमिती, उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, जळगाव, परभणी, नागपूर, चंद्रपूर, नाशिक,
जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव, परभणी, नागपूर, चंद्रपूर, नाशिक,
विधी व न्याय विभाग (कार्यासन २३ व २४),
निवड नस्ती.

| शासन पत्र क्रमांक : घबांअ-१००९/(९)/प्र.क्र.(२/१०)/पाच, दिनांक २५ जानेवारी, २०१० सोबतचे विवरणपत्र - यादी क्रमांक ३ सर्वसाधारण/अमागास (वर्ग ४ चे कर्मचारी ) | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजुरी अधिकारी | प्रयोजन | एकूण प्रमाणित अग्रिम | या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेले अग्रीम | हप्ता/ एक रकमी | शेरा |
| १ | श्री.डी.डब्ल्यू. लोहार, चोपदार | प्रबंधक, उच्च न्यायालय (मू.शा.),मुंबई | नवीन घर बांधणी | ३०७९०० (तीन हप्ते) | ९२३७० | ३रा हप्ता (३० %) | नियमानुसार |
| | | | | एकूण रुपये | ९२३७० | | |
| (एकूण रुपये ब्याण्णव हजार तीनशे सत्तर फक्त) | | | | | | | |

| शासन पत्र क्रमांक : घबांअ-१००९/(९)/प्र.क्र.(२/१०)/पाच, दिनांक २५ जानेवारी, २०१० | | |
|---|---|---|
| यादी क्रमांक | अर्जदारांची संख्या | रक्कम रुपये |
| १ | ५ | ११९१५९० |
| २ | ४ | ११२५००० |
| ४ | १ | ९२३७० |
| एकूण रुपये | १० | २४०८९६० |
| (एकूण रुपये चोवीस लाख आठ हजार नऊशे साठ फक्त) | | |

(बा.कि.रासकर)
शासनाचे अवर सचिव

शासन पत्र क्रमांक : घबांअ-१००९/(९)/प्र.क्र.(२/१०)/पाच, दिनांक २५ जानेवारी, २०१०
सोबतचे विवरणपत्र - यादी क्रमांक १
सर्वसाधारण/अमागास (वर्ग ३ व त्यावरील अधिकारी व कर्मचारी )

| अ.क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजुरी अधिकारी | प्रयोजन | एकूण प्रमाणित अग्रिम | या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेले अग्रीम | हप्ता/ एक रकमी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.एस.के. पवार, बेलिफ | जि.व स.न्या. जळगाव | नवीन घर बांधणी | २४०००० (तीन हप्ते) | ७२००० | १ला हप्ता (३०%) | नियमानुसार |
| २ | श्री.व्ही.जी. जोहरी, अधीक्षक | सह सचिव, विधी व न्याय विभाग, औरंगाबाद | कर्ज परतफेड | ४३२००० | ४३२००० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ३ | श्री.एस.एस. टल्ले, शिपाई | सचिव, विधी सेवा उप समिती, उच्च न्यायालय औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद | कर्ज परतफेड | २३१००० | २३१००० | एक रकमी | नियमानुसार |
| ४ | श्रीमती युसुफजई अख्तर खातुन इमाम अलीखान, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. परभणी | कर्ज परतफेड | १९५५९० | १९५५९० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ५ | श्री.ए.व्ही. देशमुख, लघुलेखक | जि.व स.न्या. नागपूर | नवीन घर बांधणी | ६५२५०० (तीन हप्ते) | २६१००० | २रा हप्ता (४० %) | नियमानुसार |
| | | | | एकूण रुपये | ११९१५९० | | |

(एकूण रुपये अकरा लाख एक्क्याण्णव हजार पाचशे नव्वद फक्त)

शासन पत्र क्रमांक : घबांअ-१००९/(९)/प्र.क्र.(२/१०)/पाच, दिनांक २५ जानेवारी, २०१०

सोबतचे विवरणपत्र - यादी क्रमांक २

मागासवर्गीय (वर्ग ३ व त्यावरील) अधिकारी व कर्मचारी

| अ.क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजुरी अधिकारी | प्रयोजन | एकूण प्रमाणित अग्रिम | या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेले अग्रीम | हप्ता/ एक रकमी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.के.जी. कुमावत, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. जळगाव | तयार घर खरेदी | ३३०००० | ३३०००० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| २ | श्री.आर.यू. भोयर, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. चंद्रपूर | नवीन घर बांधणी | २९०००० (तीन हप्ते) | ११६००० | २रा हप्ता (४०%) | नियमानुसार |
| ३ | श्री.एच.पी. नेरकर, लघुलेखक | जि.व स.न्या. नाशिक | कर्ज परतफेड | ४९९००० | ४९९००० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ४ | श्री.आर.जी. भारती, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. परभणी | राहत्या घराचा विस्तार | १८०००० | १८०००० | एक रकमी | नियमानुसार |
| | | | | एकूण रुपये | ११२५००० | | |

(एकूण रुपये अकरा लाख पंचवीस हजार फक्त)